निलंबन रद्द करुन शासन सेवेत पुन:स्थापित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

शासन आदेश क्र.पसंप्र-२०१५/प्र.क्र.४१/पदुम-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०० ०३२

दिनांक:- १० नोव्हेंबर , २०१६

**शासन आदेश :-**

पशुसंवर्धन विभागातील डॉ. अविनाश रा. देवळे, तत्कालीन पशुधन विकास अधिकारी (गट-अ), पवैद श्रेणी-१, तिऱ्हे, ता.उत्तर सोलापूर, जि.सोलापूर (निलंबित) यांचे विरुध्द लाचेचा सापळा प्रकरणी गुं.र.नं.क्र.३०३५/१५, लाचलुचपत प्रतिबंधक कायदा १९८८ मधील कलम-७, १३(१)(ड) सह (१३)(२) अन्वये दि.२.३.२०१५ रोजी पोलीस स्टेशन, सदर बझार, सोलापूर रोजी गुन्हा नोंदवून त्यांना अटक करण्यात आली आहे. त्यामुळे डॉ.देवळे यांना अटकेच्या दिनांकापासून दि.५.५.२०१५ च्या आदेशान्वये निलंबित करण्यात आले. डॉ.देवळे, यांच्या निलंबनास एक वर्षापेक्षा अधिक कालावधी झाला असून सदर प्रकरणी त्यांचे विरुध्द न्यायालयात अभियोग दाखल करण्यात आला आहे व विभागीय चौकशी आदेशित करण्यात आली आहे. डॉ.देवळे, यांचा निलंबन कालावधी लक्षात घेऊन त्यांच्या विरुध्द प्रलंबित न्यायालयीन व विभागीय चौकशी प्रकरणी अंतिम निर्णयाच्या अधिन राहून डॉ.देवळे, निलंबन रद्द करुन त्यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात येत आहे. तसेच पुन:स्थापनेनंतर डॉ.देवळे यांची पदस्थापना खालील तक्त्यातील त्यांच्या नावासमोर स्तंभ ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नांव | निलंबनापुर्वीचे पदस्थापनेचे ठिकाण | नविन पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | डॉ.अविनाश रा. देवळे | पशुधन विकास अधिकारी (गट-अ ), पवैद श्रेणी-१, तिऱ्हे, ता.उत्तर सोलापूर, जि.सोलापूर. | पशुधन विकास अधिकारी, (गट-अ) पवैद श्रे-१, तळा, जि.रायगड (रिक्त पदावर) |

२. संबंधित अधिकारी यांनी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. रुजू झाल्यानंतर रुजू अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१११०१५५६२७३८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shashank Madhav Sathe

Digitally signed by Shashank Madhav Sathe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=11a06bf85893554ac5cded657c0f1435af29a0ad118fb759493176e40002b178, cn=Shashank Madhav Sathe
Date: 2016.11.10 15:59:18 +05'30'

**( श. मा. साठे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत ,**

१. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य,औंध,पुणे.
२. प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त,पुणे/मुंबई.
३. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, रायगड/सोलापूर.
४. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, रायगड/सोलापूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड/सोलापूर.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, रायगड/सोलापूर.
७. संबंधित अधिकारी, (द्वारा आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य,पुणे)
८. निवड नस्ती.